




# उंबरखिंडीतील नाट्य

करतलबखानाची अंबे नळीतील शरणागती - भाग 2.



# उंबरखिंडीतील नाट्य

## करतलबखानाचा उतरला नक्षा -
## अंबे नळीतील शरणागती - भाग 1.

भीषण कुरवंडे घाटातून
कसेबसे मुगल सैन्य
उतरले

ड्युक्स नोज
म्हणून प्रसिद्ध
बाकदार टोक

# हेर म्हणजे तिसरा डोळा!

- महाराजांचं हेर खातं अत्यंत सावध आणि कुशल होतं. त्यात एकूण किती माणसं काम करीत होती हे तपशीलवार मिळत नाही. बहिर्जी नाईक जाधव, वल्लभदास गुजराथी, सुंदरजी परभुजी गुजराथी, विश्वासराव दिघे एवढीच नावे सापडतात.
- पण गुप्तरितीनं वावरणाऱ्या या गुप्तहेर खात्यात बरीच शे माणसे असली पाहिजेत असे वाटते. परदरबारात राजकीय बोलणी करण्यासाठी जाणारे स्वराज्याचे सारे वकील एकप्रकारे गुप्तहेरच होते. मुल्ला हैदर, सखोजी लोहोकरे, कर्माजी, रघुनाथ बल्लाळ कोरडे आदी मंडळी महाराजांच्या वतीने परराज्यांत वकील म्हणून जात होती. पण तेवढीच हेरागिरीही करताना ती दिसतात.
- शाहिस्तेखानाच्या ज्या ज्या सरदारांनी कोकण भागात स्वाऱ्या केल्या, त्या प्रत्येक स्वारीत शिवाजीराजांनी अत्यंत त्वरेने आणि तडफेने त्या स्वाऱ्या पार उधळून लावल्या. हे या मराठी हेरागिरीचेही यश आहे.
- अफाट समुद्रावर तर हेरागिरी करणं किती अवघड, मराठ्यांनी सागरी हेरागिरीही फत्ते केली आहे.
- हेरांना भाषा, पेहराव, खबऱ्यांना सैल हाताने पैसे सोडायची सवलत, मिळालेली माहिती त्वरित योग्य लोकांच्याकडे सोपवायची साखळी, दोन किंवा जास्त मार्गांनी शक्यतो खातरजमा करणे वगैरे गोष्टी हेरखात्यात महत्वाच्या ठरतात.

# ६. महाराजांनी खानाचा इथेच अडवायचे का ठरवले असावे?

- महाराजांनी करतलबखानाच्या हालचालींवर बारीक नजर ठेवली होती.
- कोकणात तो ठाण मांडून बसला तर उत्तर कोकणाची वाट बंद होते. आपल्याला दऱ्या-डोंगर जंगले, सुळके, बांधीव गड-किल्ले ह्या सारखे मिळणारे फायदे त्यांच्या बाजूला जातील.
- समुद्रावरील नियंत्रण आणि मिळकत एकदम बंद होईल. खानाला ओलांडून बाहेर काढणे अशक्य झाले असते.

इति विंग कमांडर शशिकांत ओक

# पाली ठाण्याचे महत्व




सुधागड

कल्याण रस्ता वसूली ठाणे

चौल बंदरमार्ग वसूली नाके

पाली - सुधागड ठाणे

अहमद नगरच्या निजामशाहीकडील ही ठाणी मुगलांची दुभती गाय होती. ती शिवाजी महाराजांकडून परत मिळवणे हा जीवन मरणाचा प्रश्न होता.

# 7. महाराजांनी उंबर टेकडीवर सैन्याचा तळ का ठेवला?

- सेनापती नेहमी उंच जागी आपले बस्तान ठरवतात.
- तिथून परिसरातील हालचाली व आपल्या सैन्याला आज्ञा द्यायला निरोपांची देवाण घेवाण करायला शक्य होते.
- वेळ पडली तर सोईनुसार पळून जायला तर काही वेळा टेकाडाच्या मागे लपायला सोय होते वगैर विचारकरून महाराजांनी टेकडीवरून यशस्वी सैन्य संचलन केले.
- इति लेफ्टनंट जनरल दत्तात्रय शेकटकर



शुभ्र वेषातील तडफदार शिवराय

# सेनानायक करतलबखानाची घालमेल

- हा मुलुख उत्तर भारतात रणांगणे गाजवलेल्यांना नवा होता. डोंगरदऱ्या त्यांना नव्या नव्हत्या. पण इतक्या जीवघेण्या उताराची व भीषण खोल दऱ्यांच्या कडेने अती अरुंद वाटेने जाताना एका बाजूला खोल खाई व दुसऱ्या बाजूला खडा पहाड ही परिस्थिती त्याच्या अनुभवाला आलेली नव्हती.
- खुरुंडा का अशाच नावाच्या घाटातून खाली उतरताना झालेली प्रचंड घालमेल, खड्या उतारातून जनावरांना त्यांच्या मनाविरुद्ध सामान वाहून न्यायला पडलेले कष्ट, काही शिपायांना  झालेले अपघात. यामुळे आता सल्ला मागावा की असेच लढावे असा पेच पडला.
- दूरवर उभ्या रायबाघन यांना भेटायला हातवारे करून बोलावून काय करावे असा सल्ला घ्यायला त्याने तंबूचा आडोसा करून त्यांना बोलावले.

# रायबाघनशी सल्ला

- चालेलेले सर्व घटना चक्र  दुरून पाहत असताना स्त्री योद्धा रायबाघन आपल्याला का बोलावले असावे याचा अंदाज घेत तंबूत पोहोचली. 'क्या करूं?' असा त्याने सवाल करून सल्ला विचारायला हाताने बसायची खूण करत विचारले. त्या  म्हणाल्या, 'शिवा किती सैन्याची तयारी करून आला आहे याचा आपणास पत्ता नाही. कदाचित तो लपवलेले सैन्य मागे ठेवून आत्ता पळून जायचे निमित्त करून आपण त्याचा पाठलागाला जायला भाग पाडायची शक्यता आहे.
- तसे झाले तर आपण मागे जाऊ देखील. अनायसे आलेली संधी म्हणून ते योग्य आहे. पण सगळे अवजड सामान असे टाकून गड उतरताना झालेल्या परिश्रमांनी थकलेल्या आपल्या सैनिकांचा दम कितपत टिकून ते शिवाजीच्या सैनिकांचा पाठलाग करतील याचा विचार व्हावा'.

# करतलबखानाला झालेल्या गफलतीची जाणीव

- आपण मोठ्या पल्ल्याच्या व दीर्घ काल चालणाऱ्या मोहिमेवर चाललोय हे त्याला माहित होते. कदाचित सिवा दूरच्या टेकड्यांवरून आपणास पाहातही असेल. जोवर आपण एखाद्या जवळच्या बळकट किल्ल्याचा आश्रय घेत नाही तोवर हे बोजड आणि प्रचंड सामान आपल्या मानगुटीवरील जू आहे.
- आपण असे या अंबा नदीच्या पात्राच्या अरुंद खिंडीत २० हजाराच्या पेक्षा जास्त संख्येने जमा आहोत. यापुढे या अरुंद जागेत शिवाजीवर हल्ला आत्मघाती ठरणार आहे.
- आपण या खिंडीत अडकलेले आहोत याचे भान राखून या ठिकाणी पलटवार करायचा की नाही त्याची जाणीव इतर सरदारांनी त्याला करून दिली. सामोपचाराने आपल्याला जाऊ द्यावे असा इतर वरिष्ठांशी खलबत करून विचार पुढे आला..
- पाठलाग करून उलट जाळ्यात पडून आपण कैद होऊन आपल्या व इतर सरदारांच्या जिवावर बेतेल. यापेक्षा वाटाघाटी करायला वकिलाला पाठवावे इसे ठरले.

# शिवाजी महाराजांच्या छावणीत

- शिवाजी महाराज नदीच्या पात्राच्या पलीकडील टेकडीवरून हे सर्व पहात होते. त्यांनी आपल्या सैन्याला नदीच्या पात्राच्या बाजूने अडकलेल्या सैनिकांवर तलवारीच्या  हातघाईचे समर्थ करायला झेंडे गोल हलवून आदेश दिला. अशी परिस्थिती साधारण तासाभरापेक्षा जास्त झाली असावी.
- महाराजांना  दूरवर खानाच्या तंबूतून एक पांढरे निशाण हाती घरलेला प्रतिनिधी येताना दिसला. तो निहत्ता असलेल्याने तलवारबाजांनी त्याला जाऊ दिले. पण बाणांच्या  वर्षावातून वाचवत तुमचा सेनापती कुठे आहे? असे विचारत असता त्या टेकडीकडे असे हाताने दाखवले गेले.
- तो वकील होणाऱ्या गोंधळाच्या धक्काबुक्कीतून वाट काढत गारमाळाच्या उंबर टेकडीवर  १०० मीटर चढून आल्यावर महाराजांच्या सैनिकांनी त्याची अंगझडती घेऊन साधारण १० मीटर दूर उभे करून त्याची ओळख विचारून आपल्या माणसातर्फे महाराजांनी त्याला सांगितले की हे आमचे सैन्य तुम्हाला मारून टाकले शिवाय आता परत जाणार नाही.
- लढाईच्या परिस्थितीत शांत राहण्याचा आदेश मी सैन्याला देऊ शकत नाही. हा संदेश तुमच्या खानाला चांगला सांगा.

# वकिलांची धावपळ

- वकिलाने हा संदेश करतलब खानाच्या कानावर घालून यापुढे काय असे म्हणून विचारणा केली. तोपर्यंत उपस्थित असलेल्या वेगवेगळ्या सरदारांकडून मिळालेल्या बातम्यात आपले सैन्य हे अचानक झालेल्या सैरभैर झालेले असून आपली जनावरे, आपले धान्याचे आणि शिबंदीचे साठे, दारूगोळा, तोफांचे सामानाच्या पेटाऱ्यात अडकून पडले असताना पाठलागाला पुढे जाता येणार  नाही असे तोफखाना व बंदुकी चालवणारे बरकंदाज म्हणू लागले.
- मागे जाण्याचा मार्ग सोपा नाही. दोन तटांवर सैन्य उभे असल्यामुळे आपल्या सैन्याला त्यांना मारून या बाजूच्या टेकड्यांना पार करून पळून जाण्यासाठी वाटा बंद झालेल्या आहेत.
- करतलब खान परिस्थितीचा आढावा घेऊन वकीलाला पुन्हा एकदा लढा थांबवण्याचा असेल तर काय करावे म्हणून  महाराजांना विचारावे असा सल्ला पडल्याने वकीलास परत पाठवले गेले.

# शरणागतांच्या बिलंदर अटी

- शस्त्रे, सामान, जनावरे, रोकड ठेवून मोकळ्या हाताने कुरवंडा घाट सोडून गेला तर विचार करता येईल असा निरोप घेऊन तो परतला.
- ही मागणी मान्य केली तर हल्ला थांबला व शांतता निर्माण झाली तर पलटवार करणे, शिवाजीवर मात करता येणे शक्य आहे.
- लढाई थांबवून या वाटाघाटीतून वेळ मिळवायला हवा असे ठरवताना आम्ही शस्त्रे खाली ठेवतो. तुम्हीपण खाली ठेवा.
- मराठ्यांच्या शरणागतांच्या रक्षणाची जबाबदारी आमचे सरदार सुखरूप पार पाडतील. असा सोचविचार करून तो निरोप वकील तिसऱ्यांदा भेटायला आला...
- महाराजांना प्रस्ताव मांडून पाहिला पण तुमच्या अटी मान्य करता येणार नाहीत असे राजांनी म्हटल्यावर आता वेळ काढण्यात अर्थ नाही असे समजून आपले पांढरे निशाण त्याने तेथूनच करतलब खानाला दिसेल अशा रीतीने  निशाण हलवून इशारा दिला.

# वकिलाची मखलाशी उघडी पाडली

- ❖महाराजांनी वकिलाच्या अटी धुडकावून लावून त्याला ताकीद केली की आम्ही आमची शस्त्रे खाली ठेवणार नाही उलट तुम्ही सर्व शस्त्रे आमच्या हाती द्यायची.
- ❖ते करताना काही गडबड केली तर तुमच्या सैन्याला तिथल्यातिथे खतम केले जाईल.
- ❖तुमच्या सेनापतींनी व अन्य सरदारांनी आमच्या देखरेखीत एका तंबूत ‘यरगमाल’ अर्थात ओलीस ठेवलेल्या कैदेत राहायचे.
- ❖जोवर सर्व सैन्याची शस्त्रे आमचे सैनिक गोळा करत नाहीत तोवर तुमचे सर्व सरदार ओलीस ठेवले जातील.
- ❖पांढरे निशाण गोल फिवून फिरवून अटी मान्य आहेत असे दाखवल्याने आता सर्व अटी मान्य करायला हव्यात.
- ❖ आपली माणसे आणखी जखमी करून चालणार नाही याचे भान ठेवून वकिलाने आपले हात शेल्यात बांधून मान हलवली.




# करतलब आणि अन्य खानाचे सरदार कैद

- आपले हलकारे सैनिकांच्या देखरेखीत समोरच्या टेकड्यावरून नेतोजी आणि तानाजी, यसाजींच्याकडे पाठवून निरोपले  की
- 'करतलबखान व अन्य सरदारांना एका तंबूच्या आडोशाला एकत्र करून त्यांची शस्त्रे काढून घेऊन त्यांना बांधून ठेवल्यानंतर निशान हलवून कळवणे'.
- हुकुमाबरोबर करतलबखान, आणि त्यांचे सरदार कैद झाल्यावर नेतोजींनी एका टेकडीवरून आणि येसाजींनी दुसऱ्या टेकडीवरून इशारा दिला.

# शरणागतांची शत्रे, जनावरे, नोकरचाकरांची कैद

- शिवाजी महाराजांनी स्वतः ला दूरवर सुरक्षित अंतर राखून आपल्या सैन्याला आदेश दिले.
- ‘शत्रूच्या कडील सर्व शस्त्रे काढून एकेका ठिकाणी गोळा करा. सैन्याबरोबर आलेल्या नोकर चाकर, तोफखानाचे गोलंदाज, दारूगोळे व गनपावडरीची पोती वाहणारे, घोडदळच्या जनावरांचे सेवक यांना ठेवून घ्या.
- व्यापारी, आचारी, पाणके, हमालांना ज्यांना परत जायचे असेल त्यांना परत पाठवा’. असे आदेश दिले.
- ‘शरणागत आलेल्या जखमी दुखापत झालेल्या सैन्याला महाराजांनी परत न जाता आसपासच्या गावात जाऊन औषधपाणी करायला परवानगी दिली’.
- काही मुगलांकडील मराठा सरदारांनी आपसूक महाराजांना सामील होण्यास सुरवात केली.

# विजयी तुताऱ्या वाजू लागल्या

- ❖ नेता(तो)जी पालकर यांना अंबा नदीच्या उजव्या पात्रात उभ्या  सैन्यास आपली पांढरी निशाणे दाखवली.
- ❖ १.पांढऱ्या निशाणांना गोल गोल फिरवून फिरवून लढा थांबवायचा इशारा केला.
- ❖ २. पुन्हा भगव्या निशाणाने गोल गोल फिरवत फिरवत आपला विजय झालेला आहे असे दर्शवणारे तुतारी आणि कर्णे यातून निरोपाचे इशारे दिले.



# अंबेनळी आणि महाराज उभे असलेली उंबरे टेकडी



२ डी नकाशात अबेनळी

Khopoli Pali Road

ARGAON NV

Sadhana Villa

CHAVANI

2BHK VILLA IN the LAP OF NATURE

StayVista at Enchanting Pastures

TUKSAI

३ डी नकाशात अबेनळी

Khambewadi
खंबेवाडी

92

Umbare
उंबारे

1.55 km

# पांढऱ्या शुभ्र वेशातील महाराजांचे रूप



# अटींची अचूक अंमलबजावणी

- ३. बैल आणि घोडे या जनावरांना बाजूला करून त्यांच्यासमवेत नोकर, चाकरांना बाहेर काढून घोड्यांच्या आणि बैलांच्या कळपा समावेत पुढे करावे.
- ४. रोकडा, तिजोऱ्या, जडजवाहिरांना नदीपात्रातील एके ठिकाणी ठेवून घेऊन त्यावर आपले नजर ठेवणारे वेगळे सैनिक लावून उभे करणे.
- ५. सैन्याबरोबर असलेला अन्य जनावरांचा गवत आणि दाणागोटा नदीच्या दुसऱ्या किनाऱ्याला एकत्र करायला सैनिक लावावे.
- ६. धान्य, खाण्यापिण्याच्या वस्तू, भांडीकुंडी व खानसामे आचारी-पाणके, यांना वेगळे उभे करणे.

# अपमानित सैनिकांची घाटाच्या तोंडाशी झडती



# खान व त्याचे सरदार खाली माना घालून परतले

- या संपूर्ण कामात तीन पेक्षा जास्त तास उलटून गेल्यावर साधारण संध्याकाळी सूर्यास्ताच्या वेळी खानाचे सर्व सैनिक घाटाच्या वरच्या बाजूला हळूहळू परतत राहिले.
- जोपर्यंत शेवटचा सैनिक मोकळ्या हाताने कुरवंड्याघाटातून बाहेर जाऊ लागले.
- त्यांच्या नंतर स्वतःखान व त्याचे बडे बडे सरदार खाली माना घालून परतलेले त्यांच्या सैनिकांनी पाहिले.
- महत्त्वाचे सर्व सामान सोडून देण्याचे आदेश पाळल्याने जिथे तिथे ढिगाने मिळवलेल्या सामानाची पाहणी करण्यास आणि त्यानंतरचे आदेश देण्यास महाराज खाली उतरले.

# अपमानित सैनिकांची घाट माथ्यावरील झडती

घाटमाथ्यावरील सैन्याची तपासणी केंद्रात
हात वर करून मोकळ्याहाताने  जाण्यासाठी
तपासणी

# उरलेले सामान - जनावरखाना आणि नालबंद

- महाराजांनी उरलेले सामान आणि ज्यांना त्यांनी थांबून ठेवलेले होते सर्वांना उद्देशून म्हटले -
  ‘माझे तुमच्याशी वैर नाही. ही जनावरे तुमच्या ओळखीची आहेत आणि त्यांची देखभाल तुम्हालाच शक्य आहे म्हणून या जनावरांच्या बरोबर तुम्हीपण हवे आहात.
- आमच्या सैन्यातील तरुणांना जनावरांची निगा, पैदास, शिकवणूक यात तरबेज करा. आमच्या लोकांना जनावरांची सवय झाली की मग हवे तर आपल्या गावी जा किंवा इथेच राहा’.
- कोकणातील गावगाड्यात सध्या शिकलगार, तांबोळी, नदाफ, अत्तार, मोमिन, लोहार, सुतार, न्हावी, मदारी, पिंजारी, फकीर असे कितीतरी सरमिसळ झालेले मुस्लिम भाईबंद पहायला मिळतात त्यांचे पुर्वज असेच पकडले गेलेले नंतर तिथेच टिकून घरोबा राहिलेले असावेत.

# मुघल सेनान्यांची परवड आणि शाहिस्तेखानाची नाचक्की

- शूरपंडिता रायबाघन यांनी शिवाजी महाराजांचे करारी सेनानायकाचे रूप, निर्णय घेण्याची क्षमता,  सेनेची आणि प्रजेची काळजी वाहणारा मराठी मुलखातील तरूण राजा या भावनेने त्यांच्याकडे पाहिले. अशा सुराज्यात आपणही सहभागी असावे असे वाटून देखील परिस्थितीनुसार त्यांनी मोगलांच्या बरोबरच राहण्याचा सुज्ञ विचार केला.
- करतलबतखानाच्या बरोबरचे मानहानीने दुखावलेले सेनानी सरदार पुण्यात परतल्यावर शाहिस्तेखानाला घडलेल्या चुकांची जळफळून, रागावून, बदनामी करून आपली फजिती झाकत  होते.
- गमावलेली जनावरे, शस्त्रसाठा, प्रचंड पैसा, रसद, मानहानीची हार यामुळे ‘भाच्चा औरंगजेबाला काय तोंड दाखवू’? असे वाटून दक्षिणेचा कमांडर इन चीफ लेफ्टनंट जनरल शाहिस्तेखान सचिंत होता.

# लढाई नंतर महाराजांचे दूरदर्शी नेतेपण

- महाराजांनी या लढाईतून मिळालेला शस्त्रसंभार तेथील जमलेल्या शूर सरदारांना हवा तेवढा घेऊन जायला परवानगी देऊन आपापल्या वस्ती - खेडी -गावातील तरूणांना गोळा करून त्यांना प्रशिक्षण देऊन जितक्या तरवारी-ढाली, धनुष्य-बाण, गोफणताण, वगैरे इथून नेल्या तितके पायदळाचे शिक्षित सैनिक आणले पाहिजे अशी अट घातली होती.
- ज्यांनी घोडे न्यायला मागितले त्यांनी  जात, वय, रंग खूण वगैरे पाहून त्यांच्या सोबत घोडा-घोडी जोड्या बरोबर एकत्र करून पैदास यासाठी, पाणी-गवत, खास अन्न तयार करणे, खरारा करणे, लगाम, खोगीर बनवणे, पाय(नाल)बंद, पागेची रखवाली व स्वच्छता राखणे,
- अशा दैनंदिन निगा राखण्यासाठी, मुघल प्रवीण कामगारांना आपापसात वाटून घेण्यास व त्यांना पगार देण्याचे कबूल करून न्यायला परवानगी दिली.

# विचारी निर्णय आणि अंमलबजावणी

- ❖ वापरायला दिलेल्या बैलांना सर्व प्रकारे काळजी घेऊन शेतीकामात लावावे, यापुढे गरज पडली तर त्या बैलांना ओझी वाहण्यास आणायला सांगितले गेले.
- ❖ हमाल कामातील लोकांची वाटणी करून त्यांना आपल्या बरोबर पाठवले. जे गैर मराठी मुलुकातील होते त्यांना चारपेक्षा जास्त एकत्र न ठेवता विभागणी करून दूर रवानगी केली गेली.
- ❖ खाण्यापिण्याचे नाशवंत पदार्थ, धान्य शिधा, खेड्यातील लोकांना बोलावून घेऊन जाण्यास सांगितले. मोठमोठाली भांडी, बोजड सामान गावकऱ्यांना बोलावून सरपंचांकडे त्याची विल्हेवाट लावण्याची कामगिरी दिली.

# परमुलुखातील कलावंतांकडून शिक्षण

- जनावरखान्यातील प्रविणांकडून घोडदौड, घोड्यावरून निशाणबाजीची तंत्रे शिकून घेण्यासाठी आपल्यापैकी गावच्या तरुणांना, आपल्या कडील घरकामाच्या लोकांनी जनावरांची पैदास,  निगा कशी राखावी, हे शिकण्याचे आदेश दिले. या साठी गावातील कुस्त्यांच्या तालमी व फड उभे केले गेले.
- पकडलेल्यांपैकी ज्यांना गावी परमुलुखात जायचे असेल अशांना काही काळानंतर सोडून देण्याचे आदेश दिले. नंतर काही आपापल्या भागात नंतर निघून गेले परंतु काही तिथेच राहून आसपासच्या लोकांची सलोखा निर्माण करून निकाहकरून आपापले घरदार करून आपले बस्तान बसवले.
- त्यातील लोकांनी शेतीला व लढाईत उपयोगाला येणाऱ्या लोखंडी, कातड्याच्या सामानांची निर्मिती व विक्री करून, पाळीव जनावरांना लागणारे सामान बनवण्याचा व्यवसाय करून यातून आपले उपजीविकेचे साधन निर्माण केले.

# आदर्शवत आखणी आणि पूर्तता

- या मोहिमेत प्रचंड मोठा जडजवाहर साठा महाराजांनी आपल्याबरोबर लढाईत मर्दुमकी गाजवणारे, शूर मावळे, यांना बक्षिशी देण्याकरता नंतर वापरला, मिळवलेला पैसा सैन्याच्या खर्चाला वापरायला तिजोरीत जमा केला गेला.
- नेतोजींना या सर्व कामावर जातीने लक्ष ठेवून जमा किंमती माल व नव्याने मिळालेल्या हजारो घोड्यांच्या पलटनींची सेना पुढच्या कामगिरीसाठी हाताखाली शिकायला तयार केली.
- अशा तऱ्हेने या मोहिमेत कमीतकमी सैन्यबळाचा वापर करून प्रचंड धनलाभ, शस्त्र, जनावरखाना याचा लाभ पुढील मोहिमा आखताना झाला.

# शरणागताशी वागणुकीचा वस्तुपाठ

- अशाप्रकारे उंबरखिंडीतील एक महत्त्वाची कामगिरी महाराजांकडून झाली ती म्हणजे शरणागताशी कसे वागावे आणि मिळवलेला शस्त्रसंभार आणि किमती सामानाचे, शत्रूच्या प्रशिक्षित मनुष्यबळाचे विचारपूर्वक विघटन कसे करावे, स्त्रिया, बालके, जखमी, निशस्त्र लोकांशी वागणून देताना धर्म, व्यवहार, रुढी आणि कायदा यांचे पालन करून राजाने कसे आदर्श वर्तन करावे याचा वस्तुपाठ ठेवला.
- आजच्या काळात शरणागत सैन्याला कशी वागणूक द्यावी यावर ‘जिनेव्हा करार’ प्रचलित आहे. महाराजांनी तेंव्हा दिलेली वागणूक आणि त्यातील कलमे कशी समानांतर आहेत याची जाणीव होते.




# शत्रूस घेरणे; शत्रुची दाणादाण

...या प्रमाणे किल्ला सर केल्यावर किंवा शत्रूच्या छावणीचा धुव्वा उडवल्यानंतर, शत्रूकडील जे लोक रणात जखमी होऊन पडले असतील, ज्यांनी शस्त्रे खाली ठेवली असतील, असे लोक शरण आल्यास त्यांस अभय द्यावे; त्याच प्रमाणे जे युद्धात सामिल झाले नसतील, त्यासही अभय द्यावे. शत्रूचा किल्ला ताब्यात आल्यावर अगोदर शत्रूच्या बाजूचे जे सैनिक असतील, त्यांचा किल्यातून निकाल लावून, आणि त्यातून आतून व बाहेरून आपल्या विश्वासातील माणसांकरवी बंदोबस्त करून मग किल्ल्यात प्रवेश करावा.

कौटिलीयं अर्थशास्त्रम्
अध्याय १४४ पर्युपासन कर्म, अवमर्देश्र्व पान १७८

**वाचकांनी शिवाजी महाराजांचे वर्तन आणि कौटिल्यांचे नियम यांचा तुलनात्मक अभ्यास करावा.**

# Surrender Procedure as per Geneva Convention

- I think the only piece of protocol is don't shoot the guy with the white flag but hear what he has to say and/or pass along his self, message or note to those higher up the chain of command.
- Normal procedure is to received the enemy representative in a secure area. Discuss terms of the surrender (if any). Allow the enemy representative to communicate the order to surrender to his forces.
- Order the enemy forces to gather in an area (or travel there) so you can take control of them.
- Secure them from escape, abuse, and provide legally required food, medical care, and rest. Notify the chain of command during this process and possibly civilian authorities.

# Geneva Convention Procedure

- If the commander has to surrender, he usually sends a senior officer to go get the enemy's attention. Sometimes, the enemy will only accept the surrender from the highest ranking officer.
- Put your weapons in one place visibly away from you (to show you are no longer attempting to harm the other side and that you are not able to do so quickly).
- Surrender might be a spoken agreement to stop fighting or could involve a written document (common for larger force) and formal surrender of a country almost always involves a written surrender
- Cooperate with the lawful instructions of one's captors.
- Usually the Geneva Convention is operable and the only information one is required to give up is rank, name, date of birth, and service number.

# DHAKA SURRENDER BY PAKISTAN FORCES 1971



ले. जनरल जेकब यांनी फक्त ३००० भारतीय सैन्यानिशी पाकिस्तानच्या ९३,००० सैनिकांना हरवले.
ले. जनरल नियाझींना  ले. जनरल जे. एस. अरोरांसमोर शरणागती पत्करायला लावली होती.